राज्यात औद्योगिक पायाभूत सुविधांची निर्मिती व विकासा संदर्भात प्राप्त प्रस्तावांना प्रशासकीय मान्यता देण्याबाबत . (औद्योगिक वसाहती)

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन निर्णय क्र.औपासू- २०१६/प्र.क्र.२२६/उद्योग-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २७ डिसेंबर, २०१६

विषय : राज्यात औद्योगिक पायाभूत सुविधांची निर्मिती व विकासा संदर्भात प्राप्त प्रस्तावांना प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

संदर्भ : १) शासन निर्णय क्र. आयआयआय पॉलिसी २०१०/प्र.क्र.७६८/उद्योग-२, दि.२२.२.२०१३
२) शासन निर्णय क्र.औपासू २०१२/प्र.क्र.२३४/उद्योग-२, दिनांक २५.२.२०१४
३) दि.३१.१२.२०१५ रोजी झालेल्या सुकाणू समितीच्या तिसऱ्या बैठकीचे इतिवृत्त दि.०८.०३.२०१६
४) विकास आयुक्त (उद्योग) यांचे क्र. उसं/साप्रोयो-२०१३/पायाभूत सुविधा/२०१६/ अे-११६०, दिनांक २२ नोव्हेबर, २०१६ व क्र.उसं/साप्रोयो-२०१३/पायाभूत सुविधा/ २०१६/ अ-१३३६, दिनांक १५ डिसेंबर,२०१६ रोजीचे प्रस्ताव.
५) शासन शुध्दीपत्रक क्र.औपासू-२०१६/प्र.क्र.२१९/उद्योग-२, दि.२०.१२.२०१६

**शासन निर्णय :-**

राज्यात औद्योगिक पायाभूत सुविधांची निर्मीती व विकास या योजनेअंतर्गत विकास आयुक्त(उद्योग) यांनी प्रस्ताव सादर केला आहे.

२. महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाचे सक्षम प्राधिकारी यांनी ब्लॉक इस्टिमेंटवर आधारित प्रकल्पांची अंदाजपत्रके व नकाशे तयार केले असून त्यांना तांत्रिक मंजूरी दिली आहे.

३. मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील महाराष्ट्र औद्योगिक पायाभूत सुविधा विकास समितीने दिनांक ३१.१२.१५ रोजी झालेल्या बैठकीमध्ये पुढे नमूद क्षेत्रातील उद्योग समूहाच्या औद्योगिक सुविधा विषयक कामांना मान्यता दिलेली आहे. सदर प्रकल्पासाठी महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ ही कार्यान्वयन यंत्रणा आहे.

४. विकास आयुक्त (उद्योग) यांनी सुकाणू समितीच्या दि. ३१.१२.१५ च्या बैठकीतील सूचनांनुसार ज्या औद्योगिक वसाहती त्यांच्या हिश्याची २५% रक्कम असून देखभाल दुरुस्ती संदर्भात उद्योग संचालनालयाशी करारनामा केला आहे. अशा पुढील सहकारी औद्योगिक वसाहतीच्या कामांना शासन या निर्णयाव्दारे प्रशासकीय मंजूरी प्रदान करीत आहे.

५. प्रस्तुत कामे ही महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाच्या कार्यक्षेत्राबाहेरील असल्याने महाराष्ट्र औद्योगिक विकास मंडळाच्या प्रचलित नियमानुसार ५% ETP charges अनुज्ञेय राहतील.

**(रुपये लाखात)**

| **महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ** | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **अ.क्र.** | **विभाग** | **मूळ प्रकल्पाची किंमत** | **सुकाणू समिती मान्यता** | **औद्योगिक वसाहतीचा हिस्सा** | **प्रशासकीय मंजूरी** |
| १. | सिन्नर सहकारी औद्योगिक वसाहत(रस्ते) | ३००.०० | २२५.०० | ७५.०० | ३००.०० |
| २. | चाकूर सहकारी औद्योगिक वसाहत(पायाभूत सुविधा) | ७७४.७० | ५८१.०२ | ९४.५४ | *३७८.१८ |
| ३. | पाचोरा सहकारी औद्योगिक वसाहत (पायाभूत सुविधा) | १४१.३८ | १०६.०३५ | ३५.३४५ | १४१.३८ |
| ४. | येवले सहकारी औद्योगिक वसाहत (पायाभूत सुविधा) | १२१.०० | ९०.७५ | ३०.२५ | १२१.०० |
| ५. | चाकण जि.पुणे नानेकरवाडी कुरुळी औद्योगिक वसाहती (पायाभूत सुविधा) | ४८०.४६ | ३६०.३४५ | १२०.१२ | ४८०.४६ |
| ६. | लोणावळा/नागरगांव येथील लोणावळा सहकारी औद्योगिक वसाहती (पायाभूत सुविधा) | ४००.४३ | ३००.३२ | १००.११ | ४००.४३ |
| | एकूण :- | २२१७.९७ | १६६३.४७ | ४५५.३६५ | १८२१.४५ |

* **[टिप** :-१) चाकूर सहकारी औद्योगिक वसाहतीने रुपये ३६८.१८ लक्ष इतकी प्रकल्पाची किंमत निश्चीत केली आहे. त्यामुळे प्रशासकीय मंजूरीच्या रकमेत बदल दिसतो.

२) येवले सहकारी औद्योगिक वसाहतीने रु. २२.६८ लक्ष इतकी रक्कम अदा केली आहे तथापि त्यांचा उर्वरित हिस्सा रुपये ७.५७ लक्ष इतका उद्योग संचालनालयाने अदा करुन घ्यावा. ]

६. ही शासन मान्यता सुकाणू समितीच्या दि. ३१.१२.१५ रोजी झालेल्या बैठकीमध्ये प्राप्त मंजूरी व सदरहू बैठकीतील सूचनांनुसार अवलंबावयाच्या कार्यपध्दतीनुसार तसेच उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र.औपासू-२०१२/प्र.क्र.२३४/उद्योग-२, दि.२५.२.२०१४ मधील परि. ६ नुसार देण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन देण्यात येत आहे.

७. सदर कामासाठी येणारा खर्च लेखाशिर्ष क्र.के-१०, मुख्य लेखाशिर्ष - ४८७५ इतर उद्योगांवरील भांडवली खर्च उपलेखाशिर्ष-६० इतर उद्योग, ८०० इतर खर्च ८००(००)(०१) औद्योगिक पायाभूत सुविधांचा विकास व निर्मिती (योजनांतर्गत) (४८७५-००२५) या योजनेखाली उपलब्ध असलेल्या निधीमधून भागविण्यात यावा.

८. हे ज्ञापन वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला उप विभाग १ ते ५ प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारातील सुधारणा संदर्भात वित्त विभाग शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम-भाग-२, दिनांक १० एप्रिल, २०१५ मधील महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका अंतर्गत नियम २७ (२) अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यात आले असून, त्याचा संकेतांक २०१७०१११११३४२७९६१० असा आहे. हे शासन ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने

Sanjay Shamkant Degaonkar

Digitally signed by Sanjay Shamkant Degaonkar
DN: c=IN, o=Industry, Energy and Labour Department, ou=Government Of Maharashtra, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=de0a2ca7914a3c02f24aa23655f609f41f2d36b0ec57da4c71f19aaf08230a79, serialNumber=56cf8c8577584adc42f070185c585c41084cc34f6683553d21ccacbfa33d4d1f, cn=Sanjay Shamkant Degaonkar
Date: 2017.01.11 11:38:15 +05'30'

**(संजय देगांवकर)**
उपसचिव

**प्रति,**

१) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षण), मुंबई
२) महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षण), नागपूर
३) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
४) निवासी लेखा परीक्षण अधिकारी, मुंबई,
५) विकास आयुक्त(उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई-४०० ०३२,
६) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई,
७) मुख्य अभियंता, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई,
८) सर्व औद्योगिक वसाहती (उपरोक्त नमूद) (मार्फत विकास आयुक्त, उद्योग),
९) मुख्य लेखाधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई,
१०) वित्त विभाग (कार्यासन अर्थसंकल्प-१४/व्यय-१६) मंत्रालय, मुंबई
११) नियोजन विभाग, (कार्यासन-१४६१), मंत्रालय, मुंबई,
१२) कक्ष अधिकारी (प्रशासन-१), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३) निवडनस्ती (उद्योग-२)